राजीव गांधी प्रशासकीय गतिमानता (प्रगती) अभियान व स्पर्धा - २०१४ या अंतर्गत अनुदानाचे वाटप.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रागांअ-२०१४/प्र.क्र.५३/१८अ,**

सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
तारीख: ३० मार्च,२०१५

**वाचा :-** १) शासन निर्णय क्रमांकः सा.प्र.वि., प्रसुधा-१००२/प्र.क्र.७६/२००२/१८-अ, दि. ०२.०८.२००२
२) शासन निर्णय क्रमांकः सा.प्र.वि., रागांअ-१११४/प्र.क्र.६८/१८-अ, दि. १४.०७.२०१४
३) विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण विभाग यांचे पत्र क्र. साशा/कार्या-१/रकाप/२०-१५ दि. २७.०३.२०१५
४) विभागीय आयुक्त कार्यालय, औरंगाबाद यांचे पत्र क्र.२०१४/साप्र/कक्ष-१/रागांअ/रवका/कार्या, दि. २७.०३.२०१५

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन शासन निर्णय दि. ०२ ऑगस्ट २००२ नुसार राजीव गांधी प्रशासकीय गतिमानता (प्रगती) अभियान व स्पर्धा, दरवर्षी दि. २० ऑगस्ट ते दि. ०२ ऑक्टोबर या कालावधीत राबविण्यात येते. त्यानुसार सन २०१४ मध्ये सदर अभियान व स्पर्धा तालुकास्तर / जिल्हास्तर / विभागीय स्तर / महानगरपालिका स्तर तसेच राज्यस्तरावर दि. २० ऑगस्ट २०१४ ते दि. ०२ ऑक्टोबर २०१४ या कालावधीत राबविण्यात आली. विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण आणि विभागीय आयुक्त कार्यालय, औरंगाबाद यांनी अभियान व स्पर्धा राबवून त्याप्रमाणे त्या त्या स्तरावर निवड झालेल्या विजेत्या / उप विजेत्या कार्यालयांना पारितोषिक वितरणासाठी अनुदानाची मागणी केली आहे.

**शासन निर्णय :-**

राजीव गांधी प्रशासकीय गतिमानता (प्रगती) अभियान व स्पर्धा-२०१४ अंतर्गत संबंधित विजेत्या / उपविजेत्या स्पर्धक कार्यालयांना पारितोषिक वितरणासाठी चालू आर्थिक वर्षी होणारा खर्च भागविण्यासाठी पुढील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे विभागीय आयुक्तांना अनुदानाचे वाटप करण्यात येत आहे. सदर रक्कम कोषागारातून काढण्यासाठी संबंधित विभागीय आयुक्त यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | रुपये |
|---|---|---|
| १ | विभागीय आयुक्त, कोकण | ३,३०,०००/- |
| २ | विभागीय आयुक्त, औरंगाबाद | २,७०,०००/- |
| | एकूण | ६,००,०००/- |

हा रु.६,००,०००/- (रुपये सहा लाख फक्त) इतका खर्च मागणी क्र. ए-४, प्रधानशीर्ष - "२०५२ सेक्रेटरीएट सर्वसाधारण सेवा-०९० सेक्रेटरीएट (००) (०१) सामान्य प्रशासन विभाग, संकेतांक (२०५२००२५)-०५-बक्षिसे" हया वित्तीय वर्षी करण्यात आलेल्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

संबंधित जिल्हाधिकारी / विभागीय आयुक्त, यांनी तालुकास्तर, जिल्हास्तर तसेच विभागीयस्तर या स्तरावर निवडलेल्या प्रथम व द्वितीय क्रमांकाच्या स्पर्धकांना पारितोषिकाची रक्कम अदा करताना शासन

निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. प्रसुधा -१००२/प्र.क्र.७६/२००२/१८-अ, दि. ०२ ऑगस्ट २००२ मधील आदेशांचे काटेकोरपणे पालन करावे.

महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिकेमधील नमुना क्रमांक १० मध्ये खर्चाचा तपशील ठेवण्यात यावा. तसेच खर्चाची माहिती (प्रमाणक क्रमांक व दिनांक, आहरण व संवितरण अधिकारी यांचे नांव कोषागार कार्यालयाचे नाव इ. व साक्षांकित देयकांच्या प्रतींसह धनादेश मिळाल्यापासून एक महिन्याच्या आत अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग / कार्यासन २६ व कार्यासन १८-अ, मंत्रालय मुंबई-३२ यांना सादर करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबतची संपूर्ण जबाबदारी संबंधित कार्यालय प्रमुखाची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३०१८४६३२६९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KHANDARE AJIT JAGANNATH

Digitally signed by KHANDARE AJIT JAGANNATH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GAD,CID - 917066, postalCode=400032, st=Maharashtra, cn=KHANDARE AJIT JAGANNATH
Date: 2015.03.31 12:42:31 +05'30'

**(अजित खंदारे)**
**कार्यासन अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग**

**प्रत,**

१) विभागीय आयुक्त, कोकण, औरंगाबाद
२) अधिदान व लेखा अधिकारी (२ प्रती- रोख शाखेमार्फत)
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा)-महाराष्ट्र-१,मुंबई (प्रत्येकी २ प्रती),
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा)-महाराष्ट्र-२,नागपूर (प्रत्येकी २ प्रती),
५) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
६) जिल्हा कोषागार अधिकारी, कोकण, औरंगाबाद,
७) उप कोषागार अधिकारी कोकण भवन,
८) वित्त विभाग/ व्यय-४,
९) अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग / का.क्र. २५ व २६
१०) निवड नस्ती, का. १८-अ.